

# आजीचा चष्मा

लेखन: **नोनी**

चित्रांकन: **तनया व्यास**

वाचन पातळी २

Original Story in English **'Grandma's Glasses'** by Noni
Illustrations: Tanaya Vyas
**'Aazicha Chashma' —** Marathi Translation by Meera Joshi


First Marathi Edition: 2015

ISBN: 978-93-5022-286-7

Typesetting and layout: Pratham Books, New Delhi

Printed by: Rave India, New Delhi

Published by: Pratham Books
**www.prathambooks.org**

**Registered office:**
PRATHAM BOOKS
#621, 2nd Floor, 5th Main, OMBR Layout
Banaswadi, Bengaluru 560 043
T: +91 80 42052574 / 41159009

**Regional Office:**
New Delhi
T: +91 11 41042483

**The development of this book has been supported by**
**HDFC Asset Management Company Limited**
***A joint Venture with Standard Life Investments***








**PRATHAM BOOKS**

# आजीचा चष्मा

लेखन: **नोनी**
चित्रांकन: **तनया व्यास**
मराठी अनुवाद: **मीरा जोशी**






आजी तिचा चष्मा सारखा हरवते. आणि मग विचारत राहते, “कुठं बरं ठेवला मी चष्मा?” चष्म्याशिवाय तिला तिचा चष्माच सापडत नाही!



म्हणून तिला सारखी मी हवी असते. मी म्हणजे जणू तिचे डोळेच. शिवाय, तिचे ‘डोळे’ शोधायलाही तिला मीच लागते!



कधीतरी तिचा चष्मा बाथरूममध्ये राहतो. कधीतरी पलंगावर असतो. तर कधी डोक्यावरच अडकवलेला असतो.

मी तिला सांगते, “अगं आजी, तो काय तुझ्या डोक्यावर आहे चष्मा.”



“अगबाई खरंच की. काय खुळी आहे मी. थँक यू, बाळा,” ती खिदळत म्हणते.

या वेळेस मात्र आजीचा चष्मा मला सापडतच नाहीये अजून.



मी तिच्या नेहमीच्या ठिकाणी पाहिला. सगळीकडं शोधला.

तिच्या डोक्यावर, बाथरूममध्ये,
तिच्या कपाटात आणि देव्हाऱ्यावर.



तिच्या आवडत्या खुर्चीखाली, आणि जेवायच्या टेबलावरसुद्धा शोधला.

पण छे, अगदी कुठंच सापडेना चष्मा. कुठं बरं गेला असेल?



मग मी चांगली गुप्तहेर बनायचं ठरवलं. आज दिवसभरात तिनं काय काय केलं ते शोधून काढूया म्हटलं.



आजी म्हणाली, “आज मी फारसं काहीच केलं नाही. वीणाच्या सासूबाई आल्या होत्या, त्यांच्याशी गप्पा मारल्या.

काय काय गावभरच्या गोष्टी सांगतात त्या. त्यांच्याबरोबर खूपदा चहा झाला आणि तुझ्या आईनं केलेले सगळे लाडू त्यांनी खाल्ले.”



राजू म्हणाला, “आजी आज खूपच कामात होती. मुख्यमंत्र्यांना तिनं तिच्या निवृत्तीवेतनाबद्दल काहीतरी पत्र लिहिलं.”

आई म्हणाली, “तुझ्या मावशीशी ती बराच वेळ फोनवर बोलत होती. आज तिनं राजूचा स्वेटरपण विणून पूर्ण केला. आणि मग ती थोडा वेळ चालायला जाऊन आली.”



आता मला चष्मा शोधण्यासाठी बरेच धागेदोरे मिळाले! घरातल्या सगळ्या नव्या जागा मी शोधल्या.

आणि घ्या, सापडला की चष्मा!



तिचा चष्मा होता टेबलावर, लोकरीत गुंडाळलेला, तिच्या पेनाच्या शेजारी, फोनच्या खाली. आणि बाजूला अर्धवट खाल्लेला लाडूपण होता !

आजीच्या पुढच्या वाढदिवसासाठी मी आता पैसे साठवून, तिला अजून एक चष्मा घेणार आहे!

**Read India**

प्रथम बुक्सची स्थापना २००४ मध्ये झाली. मुलांच्या वाचनाला चालना देण्यासाठी, 'रीड इंडिया' नावाचा उपक्रम राष्ट्रीय पातळीवर सुरू झाला होता. त्याच चळवळीचा एक भाग म्हणून ही स्थापना झाली. प्रथम बुक्स ही अनेक भारतीय भाषांमध्ये, दर्जेदार पुस्तकं प्रकाशित करणारी ना-नफा संस्था आहे. 'प्रत्येक मुलाच्या हाती पुस्तक' हे आमचं ध्येय असून, त्याद्वारे भारतातल्या सर्व मुलांपर्यंत वाचनाचा आनंद पोहोचवायचा आहे. यात कोणत्याही प्रकारे सहभागी होण्यासाठी info@prathambooks.org या पत्त्यावर इमेल पाठवा.

---



रोहिणी निलेकणी जेव्हा लहान मुलांसाठी लेखन करतात, तेव्हा नोनी हे टोपणनाव घेतात. त्या लेखिका आहेत तसेच अनेक समाज उपयोगी प्रकल्पांसाठी त्यांनी देणग्या दिल्या असून 'प्रथम बुक्स' च्या त्या सह-संस्थापक आहेत.



तनया व्यास या 'नॅशनल इन्स्टिट्यूट ऑफ डिझाईन' मध्ये शिक्षण घेतलेल्या चित्रकार आणि ॲनिमेटर आहेत. वेगवेगळ्या माध्यमांचा वापर करून रोज काही नवनिर्मिती करणं ही त्यांची खास आवड. चॉकलेटमध्ये पोहायला, चंद्रावर उडी मारायला, कविता करायला, मांजरांबरोबर गायला, फोटो काढायला आणि भिंतीवर चित्रं काढायला त्यांना आवडतं.

आजीचा चष्मा सारखा हरवतो. मग कधीतरी तिला चष्मा शोधण्यासाठी हुशार गुप्तहेराची मदत घ्यावी लागते!

टप्प्याटप्प्याने वाचायला शिकणे. या पुस्तकाची वाचन पातळी २ आहे.

**प्रारंभिक वाचन / मुलांना वाचून दाखवण्यासाठी** १

वाचायला नुकतीच सुरुवात करणाऱ्या आणि गोष्ट ऐकायला आवडणाऱ्या छोटुकल्यांसाठी.

**वाचायला शिकणे** २

ओळखीचे शब्द वाचू शकणाऱ्या आणि मदत घेऊन नवे शब्द वाचणाऱ्या मुलांसाठी.

**स्वतंत्रपणे वाचन** ३

आपले आपण वाचणाऱ्या मुलांसाठी.

**सराईतपणे वाचन** ४

आत्मविश्वासानं वाचणाऱ्या मोठ्या मुलांसाठी.




**PRATHAM BOOKS**

प्रथम बुक्स ही ना-नफा संस्था असून मुलांमध्ये वाचनाची आवड रुजावी यासाठी अनेक भारतीय भाषांमध्ये पुस्तकं प्रकाशित करते.

www.prathambooks.org

Grandma's Glasses (Marathi)

MRP: ₹ 30.00

ISBN 978-93-5022-286-7


